**श्री.ए.एम. सोनवणे यांना सहाय्यक वन संरक्षक गट -अ (कनिष्ठ श्रेणी) पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन आदेश क्र. एमएफएस-२०२०/प्र.क्र.११९/फ-८**

मादाम कामा मार्ग, हूतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक -२५ नोव्हेंबर, २०२१.

<u>वाचा -</u> १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. एमएफएस-२०१३/५०७/प्र.क्र.१५४/फ-८, दि.२१/०२/२०१४.

२) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांचे दि.२१/०९/२०२१ रोजीचे आदेश

३) मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथील विशेष अनुज्ञा यचिका क्र. २४३०६ /२०१७.

४) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (कार्मिक) नागपूर यांचे पत्र क्र.मवसे/वैन/एएमएस/ प्र.क्र.५९७ (१४-१५) /१४६/२०-२१ दि.२८/०४/२०२० व दि. १३/१०/२०२१

<u>प्रस्तावना -</u>

अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), नागपूर यांचे पत्र कक्ष-१०-(अ)२/आस्था/जे.या. /प्र.क्र.२४/१३/१४/४८६, दि.२८/०८/२०१३ अन्वये वनक्षेत्रपाल, गट-ब या संवर्गाची दि.०१/०१/२००९ ते ०१/०१/२०१२ ची अंतिम जेष्ठता यादी प्रसिद्ध करण्यात आली आहे. दि.१.०१.२०१२ च्या जेष्ठता सुचीमध्ये श्री.ए. एम. सोनवणे यांचा जेष्ठता क्र.५४७ असून श्री. नंदकुमार नाना कुप्ते यांचा जेष्ठता क्र.५५१ असा आहे.

वनक्षेत्रपाल, गट-ब या संवर्गातील अधिकाऱ्यांना सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या संवर्गामध्ये पदोन्नती करिता सन २०१३-१४ ची निवडसूची तयार करण्यासाठी दि.१३/१२/२०१३ रोजी पार पडलेल्या विभागीय चौकशी समितीच्या बैठकीच्या वेळी, श्री.ए. एम. सोनवणे, तत्का.वनक्षेत्रपाल यांच्या विरूद्ध महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ च्या नियम १० नुसार विभागीय चौकशी सूरू होती. त्यामुळे त्यांच्या पदोन्नती आदेश निर्गमित न करता, त्यांचे प्रकरण मोहरबंद लिफाफ्यात ठेवण्यात आले व त्यांना खुल्या प्रवर्गामध्ये त्यांच्यापेक्षा कनिष्ठ असलेले श्री.नंदकुमार नाना कुप्ते यांना शासन निर्णय महसूल व वन विभाग दि.२१/०२/२०१४ अन्वये सहायक वनसंरक्षक (गट-अ) (कनिष्ठ श्रेणी) या संवर्गामध्ये पदोन्नती देण्यात आली आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी श्री.ए.एम. सोनवणे यांच्या विरुध्द सुरु असलेल्या विभागीय चौकशी प्रकरणी दि.०४/०५/२०१७ अन्वये अंतीम आदेश पारित केले असून, श्री. ए.एम.सोनवणे यांना सेवापुस्तक ताकीद देऊन प्रकरण निकाली काढले आहे. श्री. सोनवणे यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई येथे मुळ अर्ज क्र. ७०४/२०२१ दाखल केला होता. त्याबाबत मा. न्यायाधिकरणाने दि.२१/०९/२०२१ रोजी श्री. सोनवणे यांच्या विनंती अर्जाबाबत निर्णय घेण्याचे आदेश दिले होते. त्यानुषंगाने श्री.ए.एम. सोनवणे यांना सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या पदोन्नतीच्या पदाचा मानीव दिनांक मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश -**

शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, मा.उच्च न्यायालय,मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये दि.२५/०५/२००४ चा शासन निर्णय रद्द करून पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या उक्त निर्णयास स्थगिती देण्याच्या अनुषंगाने राज्य शासनाच्यावतीने मा.सर्वोच्च न्यायालयामध्ये दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२४३०६/२०१७ मधील अंतरीम/अंतिम निर्णयाच्या अधीन राहून श्री.ए.एम.सोनवणे यांचे पेक्षा कनिष्ठ असलेले परंतू त्यांचे अगोदर सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या संवर्गात पदोन्नतीच्या पदावर रुजू झालेले श्री.नंदकुमार नाना कुप्ते यांच्या पदोन्नतीच्या पदावर रुजू झाल्याचा दि.०१/०३/२०१४ ही मानीव तारीख मंजूर करण्यात येत आहे.

२. शासन परिपत्रक महसूल व वन विभाग दिनांक ०७/०३/२०१९ अन्वये सहा.वनसंरक्षक या संवर्गाची दिनांक १.१.२०१९ अंतिम जेष्ठता यादी प्रसिध्द करण्यात आली. सदर जेष्ठता यादीमध्ये श्री.ए.एम.सोनवणे यांचे नाव श्री.नंदकुमार नाना कुप्ते यांच्या वर जेष्ठता क्रमांक १९५-अ असे राहील.

३. श्री.ए.एम.सोनवणे यांना सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या पदावरील दि.०१/०३/२०१४ हा मानीव दिनांक केवळ जेष्ठतेसाठी प्रदान करण्यात येत आहे.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-९/ मवसे / मुले / आ.प्र.यो. / प्र.क्र.२४ / १९-२०/ १६५९ / २०-२१ दि.२५/०२/२०२१ अन्वये श्री.ए.एम. सोनवणे यांना आश्वासित प्रगती योजनेतंर्गत दुसरा लाभ (विभागीय वन अधिकारी या वरीष्ठ पदाची वेतनश्रेणी) दि.०१.०१.२०१४ पासून लागू करण्यात आला आहे. त्यामुळे श्री.सोनवणे यांना मानीव दिनांक मंजूरीच्या अनुषंगाने पुन्हा वेतन निश्चिती करण्यात येणार नाही तसेच त्यांना कोणतीही थकबाकी अनुज्ञेय राहणार नाही.

५. हे आदेश संबंधित वर्षाच्या निवडसुचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता प्राप्त होण्याच्या अधीन तसेच सामान्य प्रशासन विभाग अनौ.संदर्भ क्र.११६३/२०२१/का.१२ दि.२८/१०/२०२१ व वित्त विभाग अनौ/सं.क्र.३८०/२१/सेवा-३ दि.१०/११/२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२१११२५१४५७०७५४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL PANDURANG PANDHARE

Digitally signed by SUNIL PANDURANG PANDHARE
Date: 2021.11.25 15:00:44 +05'30'

**( सुनिल पांढरे )**
उप सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे.
५. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र मुंबई/नागपूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, ठाणे
७. मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
८. प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
९. संबंधित अधिकारी / प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत
१०.निवड नस्ती (फ-८ कार्यासन).